**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मविअ-३८२०/(प्र.क्र.२२/२०२०)/१७-स,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय , मुंबई ४०००३२**
तारीख: २२ एप्रिल, २०२०.

संदर्भ -

१) शासन वित्त विभाग परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थसंकल्प-३, दि.१६ एप्रिल,२०२०

## शासन निर्णय -

महाराष्ट्र विनियोजन विधेयक,२०२० (महाराष्ट्र विनियोजन अधिनियम,२०२० यांच्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह) यास विधानमंडळाने मंजूरी दिलेली असून महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे आणि ते २०२० चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १५ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग-४ दिनांक १८ मार्च, २०२० मध्ये प्रसिध्द करण्यात आले असल्याचे उपरोक्त संदर्भाधिन शासन परिपत्रकान्वये कळविण्यात आले आहे.

या अधिनियमान्वये कोरोना विषाणूमुळे उद्भवलेल्या महामारीच्या परिस्थितीत प्रशासकीय विभागास सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या अर्थसंकल्पिय तरतूदी पहिल्या तीन महिन्यांकरिता (जुन,२०२० अखेर) एकूण वार्षिक तरतूदीच्या १५ ते २५ टक्केच्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीद्वारे (बीम्स) वितरीत करण्यास मान्यता दिलेली आहे.तथापि वित्त विभागाकडून अर्थसंकल्पीय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) १०टक्के मर्यादेत तरतूदी खर्चासाठी उपलब्ध करण्यात आलेल्या आहेत. त्या कार्यान्वयन / आहरण व संवितरण अधिकाऱ्यांकडे आवश्यकतेनुसार सुपूर्द करण्यात येत आहेत. तथापि कोरोना विषाणूमुळे उद्भवलेल्या परिस्थितीत राज्यात लॉकडाऊनची स्थिती असल्याने महसूलाचे सर्व स्त्रोत सध्या शुन्यवत झालेले आहेत.लॉक डाऊनमुळे पुढील ३ ते ४ महिने राज्याच्या कर व करेतर महसुल जमेची स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाचीच राहण्याची शक्यता असल्याने संदर्भाधिन परिपत्रकातील परिच्छेद क्र.२ (अ) मधील नमूद उद्दीष्टशीर्षातंर्गत वितरीत निधी खर्च करताना विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन करावा. तसेच परिच्छेद क्र.२ (ब) मध्ये नमूद केल्यानुसार उर्वरित सर्व उद्दीष्टांतर्गतचा खर्च वित्त विभागाच्या अनुमतीशिवाय करता येणार नाही.

अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी संदर्भाधिन परिपत्रकातील परिच्छेद क्र. ४ ते १३ व सोबतच्या परिशिष्ठामधील मार्गदर्शक सुचनांचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या नियमांचे पालन करावे. वित्तीय अधिकार नियमपुस्तिका भाग-१, वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम-भाग-२,दिनांक१७.४.२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागांना वेळोवेळी वित्तिय अधिकार नियमपुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान केलेल्या वित्तिय अधिकारांतर्गत असलेल्या प्रकरणांबाबत निधी वितरण करताना उपरोक्त परिच्छेदातील अटी व शर्तीचे पालन करण्याच्या अटींच्या अधिन राहून, वित्त विभागाची वेगळयाने मान्यता घेण्याची आवश्यकता नाही.

तथापि उपरोक्त शासन निर्णयात नमूद केल्याव्यतिरिक्त ज्या बाबींसाठी विभागांना विवक्षितपणे वित्तीय अधिकार प्रत्यार्पित केले नसतील अशा बाबींच्या संदर्भात वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता असेल.

सहायक अनुदाने(वेतनेतर):-विविध शासकीय / प्रशासकीय संस्थांना तसेच अनुदानित संस्थांना सहायक अनुदाने मंजूर करण्यापूर्वी त्यांचेकडून पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानाच्या खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे विभागाने प्राप्त करावीत. शक्यतो यापूर्वी दिलेल्या अनुदानाचा विनियोग पूर्ण झाल्याशिवाय पुढील अनुदान वितरीत करण्यात येवू नये. कोषागार अधिका-यांनी सहायक अनुदानामधून निधी आहरीत करण्यासाठी सादर केलेल्या देयकासोबत संबंधित संस्थेचे लगतच्या मागील महिन्यातील बँक अकाऊंट स्टेटमेंट (Bank Account Statement) ची प्रत जोडलेली नसल्यास देयक पारित करु नयेत.

स्थानिक स्वराज्य संस्था व महामंडळे यांना अनुदान :- स्थानिक स्वराज्य संस्थां तसेच महामंडळे यांना अनुदाने वितरीत करण्यापूर्वी सदर संस्थांकडून राज्य शासनास येणे असणाऱ्या रकमांचा आढावा घेण्यात यावा व त्या वसुल करुनच उर्वरित अनुदान वितरीत करण्यात यावे. तसेच शासनाद्वारे सदर संस्थांना वितरीत केलेल्या अनुदानाचा विनियोग व अखर्चित रक्कम कोठे ठेवली आहे याबाबतची तपशिलवार माहिती एकत्रित करण्यात यावी. सदर अखर्चित निधी बँकेमध्ये ठेवलेला असल्यास त्याची बँक अकाऊंट स्टेटमेंट (Bank Account Statement) शासनास सादर करावेत. एखाद्या कार्यक्रमावरील खर्चासाठी उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी अखर्चित असल्यास त्याच प्रयोजनासाठी चालू वर्षी वित्त विभागाच्या अनुमतीशिवाय निधी वितरीत करु नये.

अखर्चित रकमा:- विविध कारणांमुळे अखर्चित राहिलेला निधी विभागांनी त्यांच्या अधिनस्त महामंडळाकडे हस्तांतरीत करुन तांत्रिकदृष्टया खर्च झाल्याचे दाखविले जाते, ही एक प्रकारची अनियमितता आहे. तसेच त्यांच्या अधिनस्त असलेला यापूर्वीचा अखर्चित निधी (स्वीय प्रपंजी खात्यातील/महामंडळाच्या खात्यातील वा इतर प्रकारे खर्च दर्शवून बाहेर ठेवण्यात आलेला) संपूर्णत: खर्च झाल्याशिवाय तरतुदी आहरित वा वितरीत करु नयेत. स्वीय प्रपंजी लेख्याखाली विभागाकडे अखर्चित असलेल्या निधीचा ताळमेळ घालून व लेखापरिक्षण करुन निधी विहित मुदतीत खर्च न झाल्यास तो शासनाच्या तिजोरीत परत करण्यात यावा. सदर अखर्चित निधी बँकेमध्ये ठेवलेला असल्यास त्याचे बँक अकाऊंट स्टेटमेंट **(Bank Account Statement)** शासनास सादर करावे.

केंद्र पुरस्कृत कार्यक्रम:- केंद्र पुरस्कृत योजनेसंदर्भात केंद्र शासनाकडून निधी प्राप्त झाल्याची खात्री विभागाने नस्त्यावर वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेकडून करुन घ्यावी (यासाठी व्यय/अर्थसंकल्प शाखेला नस्ती संदर्भीत करण्याची आवश्यकता नाही) व तदनंतर सदर निधी तसेच असल्यास राज्य शासनाचा समरुप हिस्सा प्रशासकीय विभागाने त्यांच्यास्तरावर वितरीत करावा. त्यासाठी नस्ती पुन्हा वित्त विभागास सहमतीसाठी वेगळयाने संदर्भीत करण्याची आवश्यकता नाही. मात्र मागील वर्षामधील केंद्र शासनाचा निधी चालू वर्षी खर्च करावयाचा असल्यास त्यास आवश्यकतेप्रमाणे यथास्थिती नियोजन/आदिवासी विकास/सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग तसेच वित्त विभागाची सहमती घेणे अनिवार्य राहिल.

सहायक अनुदाने (वेतन):- शासनाद्वारे देण्यात येणारे वेतन अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहिल. कोणत्याही परिस्थितीत वेतन अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पध्दतीने वितरित करण्यात येऊ नये.

वरील प्रमाणे अर्थसंकल्प अंदाज वितरण व संनियंत्रण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी संदर्भाधिन परिपत्रकात नमूद सुचनांची तसेच सोबतच्या परिशिष्टातील नमूद केलेल्या बाबींच्या तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची प्रतिपूर्ती होत असल्यास निधी वितरीत करावा, अन्यथा अशा प्रस्तावास आवश्यक तेथे नियोजन विभाग/ सामाजिक न्याय विभाग व विशेष सहाय्य विभाग/ आदिवासी विकास विभाग यांच्या मान्यतेनंतर वित्त विभागाच्या व्यय शाखा व अर्थसंकल्प शाखा यांची मान्यता घेणे आवश्यक आहे. तसेच असे मान्यतेचे प्रस्ताव वित्त विभागाकडे पाठवितांना कोणत्या अटी व शर्तीस शिथीलता आवश्यक आहे ते स्पष्टपणे नमूद करुनच योग्य त्या कारणमिमांसेसह प्रस्ताव वित्त विभागाला सहमतीसाठी पाठवावेत.

उपरोक्त अटी व शर्ती बरोबरच वित्त विभागाने सूचित केल्यानुसार, खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली व सर्व अटी/शर्तीचे पालन करणे ही जबाबदारी विभागांची राहिल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००४२३११४४५००६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SEEMA BABAN JADHAV

Digitally signed by SEEMA BABAN JADHAV
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=f6d09269f267e078edac2ae3cc1bfc4eca4bca6ff5fcd46acba37328f15459ce, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=c3b10586d38b4d3239fcdf3fdfd468a90a501b4cca758083258832d5f17859fb, ou=CO OPERATION MARKETING AND TEXTILE DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SEEMA BABAN JADHAV
Date: 2020.04.23 12:18:59 +05'30'

**( सी.ब. जाधव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. विरोधी पक्ष नेता (विधान परिषद/विधान सभा), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
२. मा. प्रधान सचिव (पणन) सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
३. मा. प्रधान सचिव (सहकार) सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई-३२

४. मा. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
५. सहकार आयुक्त व निबंधक,सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. आयुक्त (साखर),महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. संचालक, (पणन) , पणन संचालनालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. संचालक, रेशीम संचालनालय,महाराष्ट्र राज्य, नागूपर.
९. संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय,महाराष्ट्र राज्य, नागूपर.
१०. सहनिबंधक,सहकारी संस्था (आदिवासी उप योजना) महाराष्ट्र राज्य, नाशिक.
११. प्रबंधक, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई.
१२. सचिव, महाराष्ट्र राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे.
१३. सह सचिव (श्री चव्हाण), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
१४. उप सचिव (श्री घाडगे/श्री.खोरगडे /डॉ. गायकवाड/श्री. वळवी), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
१५. अवर सचिव (श्री शिंगटे) , सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
१६. महालेखापाल,महाराष्ट्र-१(लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता/स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई.
१७. महालेखापाल, महाराष्ट्र -२ (लेखापरीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१९. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
२०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२१. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
२२. उप सचिव, (अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-१३, व व्यय-२/अर्थोपाय) वित्त विभाग मंत्रालय, मुंबई.
२३. उप सचिव (का-१४११/१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
२४. सामाजिक न्याय विभाग (वि.घ.यो.) मंत्रालय, मुंबई ३२.
२५. निवड नस्ती कार्यासन १७-स.